**<u>शुध्दीपत्रक -</u>**
**ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत “ब” वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या विकास कामांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**
**<u>विठ्ठल रुखमाई मंदिर / जगदंबा माता मंदिर पिंपरखेड बु. ता.घनसावंगी जि.जालना</u>**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः तीर्थवि-२०२४/प्र.क्र.५२/यो-११**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
**दिनांक: ०५ जुलै,२०२४**

**<u>संदर्भ</u>:-** ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. तीर्थवि-२०२३/प्र.क्र.२७१/यो-११ दि.१३.०३.२०२४.

<u>प्रस्तावना</u> :-

संदर्भिय शासन निर्णयान्वये जालना जिल्हयातील विठ्ठल रुखमाई मंदिर/जगदंबा माता मंदिर पिंपरखेड बु. ता.घनसावंगी जि.जालना या “ब” वर्ग प्राप्त ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी विविध विकास कामांसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून प्रशासकीय मान्यतेच्या १०% प्रमाणात प्रथम टप्प्यात निधी जिल्हा परिषद, जालना यांना वितरीत करण्यात आला होता. परंतु, सदर तीर्थक्षेत्राकडील विकास कामांचा प्रस्ताव, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक २, जालना या कार्यालयाने तयार करून सादर केल्यामुळे जिल्हा परिषदेने निधी आहारीत न करता शासनास समर्पित केला आहे.

**<u>शासन शुध्दीपत्रक:-</u>**

या तीर्थक्षेत्राच्या ठिकाणच्या विकास कामांचा प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार करून सादर केलेला असल्याने, शासन शुद्धीपत्रकाद्वारे तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करावयाच्या कामांची यंत्रणा “जिल्हा परिषद” ऐवजी “**सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक २, जालना**” अशी सुधारणा करीत आहे. यामुळे संदर्भीय शासन निर्णयात ज्या ठिकाणी “मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद” असे नमूद केले आहे, त्याठिकाणी “कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक २, जालना” असे वाचण्यात यावे. मंजूर प्रशासकीय कामांसाठी निधी वितरणाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

०३. संदर्भीय शासन निर्णयात नमूद अन्य अटी व शर्ती कायम असल्याने त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

०४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०५१५०४२९८०२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.07.10 13:10:40 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मलबार हिल, मुंबई.
२) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, छ.संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
६) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, जालना.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
१०) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
११) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२.
१२) कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का.यो-११), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.